**पुणे (शहर) जिल्ह्यातील हिंजवडी पोलीस स्टेशन येथील गु.र.क्र.४९/२०१७ या गुन्ह्याप्रकरणी मा.सत्र न्यायालय,पुणे येथे न्यायालयीन कामकाज पाहण्याकरीता विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्त करण्यात आलेल्या ॲड.श्री.उज्वल निकम यांना व्यावसायिक फी मंजूर करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः एसपीपी १११७/प्र.क्र.२९८/पोल-१०**

२ रा मजला, मंत्रालय, हुतात्मा राजुगुरु चौक

मादाम कामा रोड, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : ३० ऑगस्ट, २०१८

**संदर्भ:-** **शासन अधिसूचना, विधि व न्याय विभाग क्र.एसपीपी २०१८/यु.ओ.आर.६९/डी-१४, दिनांक २५.०७.२०१८.**

**शासन निर्णय:-**

पुणे (शहर) जिल्ह्यातील हिंजवडी पोलीस स्टेशन येथील गु.र.क्र.४९/२०१७ या गुन्ह्याप्रकरणी मा.सत्र न्यायालय,पुणे येथे न्यायालयीन कामकाज पाहण्याकरीता ॲड.श्री.उज्वल निकम यांची विधि व न्याय विभागाच्या उपरोक्त दि.२५.०७.२०१८ च्या अधिसूचनेन्वये विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्ती करण्यात आली आहे. सबब,प्रस्तुत प्रकरणी ॲड.श्री.उज्वल निकम यांना खालीलप्रमाणे व्यावसायिक फी अदा करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| i. | प्रतिदिन परिणामकारक सुनावणी फी | - ₹५०,०००/- |
| ii. | विचारविनिमय फी (प्रतितास)<br>(कमाल मर्यादा प्रतिदिन ₹५०,०००/-) | - ₹१५,०००/- |
| iii. | हॉटेलचा खर्च प्रतिदिनी | - ₹५,०००/- |
| iv. | प्रवास खर्च | - रेल्वेचा प्रत्यक्ष प्रवास खर्च |

२. परिणामकारक सुनावणीचे दिवस संबंधीत प्रकरणाच्या पर्यवेक्षीय पोलीस उप आयुक्त दर्जाहून कमी नाही, अशा अधिकाऱ्याकडून प्रमाणित करुन घेण्यात यावेत व कोणत्याही प्रकारचे अतिरिक्त प्रदान होणार नाही, याची दक्षता घ्यावी. तसेच, प्रस्तुत प्रकरणी ॲड.श्री.उज्वल निकम यांना उपरोक्त फी व्यतिरिक्त अपरिणामकारक सुनावणी फी किंवा अन्य कोणत्याही प्रकारची फी वा भत्ता अनुज्ञेय असणार नाही.

३. यासाठी येणारा खर्च या विभागाच्या मागणी क्र.बी-१, २०५५ पोलीस - (००)(१०९), जिल्हा पोलीस (००) (०१), जिल्हा पोलीस दल- (२०५५ ०१६८) - २८ व्यावसायिक सेवा, या लेखाशीर्षाखालील त्या त्या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून व मासिक निधी विवरणपत्रानुसार भागविण्यात येईल.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२२१/१८/व्यय-७, दिनांक ०८.०८.२०१८ अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक क्र. २०१८०९०११५३५३२१४२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kishor Shyamrao Bhalerao

Digitally signed by Kishor Shyamrao Bhalerao
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ce6f6edd7e1dfc6b4d6b65b7d93aa1a1dbcf0ec79c7c2143850ff6e8fdcb4c0d, serialNumber=94524ab889e2fa9e6bfe5e1e58426881bc36b968ffd0f45ce2d4bd3ff527ded2, cn=Kishor Shyamrao Bhalerao
Date: 2018.09.01 15:38:45 +05'30'

**(किशोर शामराव भालेराव)**
उप सचिव (विधि),गृह विभाग,
महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. पोलीस महासंचालक,महाराष्ट्र राज्य,मुंबई.
२. पोलीस आयुक्त,पुणे शहर.
३. पोलीस अधीक्षक, पुणे (शहर).
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा)-१,महाराष्ट्र राज्य, मुंबई .
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६. निवासी लेखापरीक्षा अधिकारी,मुंबई.
७. जिल्हा कोषागार अधिकारी,पुणे.
८. विधि व न्याय विभाग (का-१४), मंत्रालय, मुंबई.
९. वित्त विभाग (व्यय- ७), मंत्रालय, मुंबई.
१०.ॲड.श्री.उज्वल निकम, ४८, बॅरीस्टर निकम चौक,जि.जळगांव-४२५ ००१.
१२. निवडनस्ती (पोल-१०).